**राष्ट्रीय हरित सेना कार्यक्रमांतर्गत अस्तित्वातील शाळांमधील इको-क्लबचे बळकटीकरण करण्यासाठी राज्यांतर्गत "विद्यार्थी हरित सेना" निर्माण करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनम-२०१६/प्र.क्र.७८/फ-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ०६ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

सध्या जगात पर्यावरणाचे रक्षण आणि सुरक्षितता हे मानवी समूहासमोरील मोठे आव्हान आहे. बहुतेक सर्व समस्यांचे मूळ हे आपल्या पर्यावरण विषयक प्रवृत्तीमध्येच दडलेले आहे. लहान मुले ही अतिशय संस्कारक्षम असून, देशाचे भवितव्य त्यांच्या हातात आहे. त्यामुळे मुलांमध्ये पर्यावरण रक्षणाबाबत गोडी व जागरूकता निर्माण केल्यास भावी काळात त्याचा निश्चितच चांगला परिणाम अनुभवयास मिळेल. या विद्यार्थ्यांना पर्यावरणविषयक उपक्रम राबविण्यासाठी दिशा देण्याचे कार्य वन विभागामार्फत करण्यात येत असून त्याकरिता जानेवारी, २००७ पासून या योजनेंतर्गत अनेक नाविन्यपूर्ण उपक्रमांचे आयोजन विद्यार्थी व शिक्षक यांचे सहभागातून करण्यात आले आहे.

विद्यार्थ्यांना पर्यावरणाच्या सद्य:स्थितीबाबत विविध उपक्रमांद्वारे अद्ययावत माहिती देणे, पर्यावरण संवर्धनाच्या प्रत्यक्ष कामामध्ये त्यांना सहभागी करून घेणे आणि त्यांच्या माध्यमातून जनसामान्यांमध्ये जनजागृती करणे व लोक सहभाग वाढवणे ही या योजनेची मुख्य उद्दिष्टे आहेत. थोडक्यात पर्यावरणाच्या प्रश्नांची जाण असलेली व संवेदनशील नवीन पिढी तयार करण्याचे महत्वाचे काम या योजनेअंतर्गत करण्यात येत आहे.

वरील कार्यक्रमाचा भाग म्हणून राज्यात केंद्र शासनामार्फत प्राप्त होणाऱ्या सहाय्यक अनुदानातून राष्ट्रीय हरित सेना ही योजना प्रत्येक जिल्ह्यातील २५० शाळांमधून राबविण्यात येते. याकरिता केंद्र शासनामार्फत प्रति वर्षी प्रति शाळा रुपये २५००/- इतके अनुदान प्राप्त होत असते. सदर अनुदान अत्यल्प असल्याने शाळांमध्ये काही ठोस कार्यक्रम हाती घेण्यास अनुदानाची कमतरता भासते. सध्या राज्यात एकंदर ८८०७ शाळांमध्ये राष्ट्रीय हरित सेना अंतर्गत पर्यावरण चमू (इको-क्लब) स्थापित करण्यात आले आहेत. सदर योजनेस बळकटी देणे गरजेचे आहे. त्या अनुषंगाने **"विद्यार्थी हरित सेना"** ही योजना राज्यस्तरावर राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे या योजनेचे महत्व विचारात घेऊन राज्य योजनेंतर्गत राज्यातील राष्ट्रीय हरित सेना हा कार्यक्रम अस्तित्वात असलेल्या ८८०७ शाळांमध्ये **"विद्यार्थी हरित सेना"** ही नवीन योजना राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील सर्व जिल्ह्यातील प्रती शाळा रु. २५००/- प्रमाणे ८८०७ शाळांसाठी **"विद्यार्थी हरित सेना"** या योजनेंतर्गत सन २०१६-१७ करिता खाली नमूद केल्याप्रमाणे राष्ट्रीय हरित सेनेअंतर्गत ईको-क्लब असलेल्या शाळांना राज्यामार्फत खालीलप्रमाणे अनुदान उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.-

| अ.क्र. | तपशिल | दर(रुपये) | अनुदान(रुपये) |
|---|---|---|---|
| १ | ८८०७ इको क्लब शाळांना लागणारे अनुदान | २५००/-प्रती शाळा | २,२०,१७,५००/- |

३. या उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून "राष्ट्रीय हरित सेना" मध्ये कार्यरत असलेल्या इको-क्लब शाळांमध्ये खाली नमूद केलेले उपक्रम राबविणे अभिप्रेत आहेत :-

१. विद्यार्थ्यांना पर्यावरणाच्या सद्य:स्थितीबाबत विविध उपक्रमांद्वारे अद्ययावत माहिती देणे.
२. पर्यावरण संवर्धनाच्या प्रत्यक्ष कामामध्ये विद्यार्थ्यांना सहभागी करुन घेणे.
३. विद्यार्थ्यांच्या माध्यमातून जनसामान्यांमध्ये जनजागृती करणे.
४. विद्यार्थ्यांच्या माध्यमातून बीज संकलन व पेरणी, रोपवाटिका निर्मिती, वृक्षलागवड करणे.
५. विद्यार्थ्यांच्या माध्यमातून प्रदूषण नियंत्रण करणे.
६. विद्यार्थ्यांच्या माध्यमातून उर्जा बचतीबाबत जनजागृती करणे.
७. विद्यार्थ्यांच्या माध्यमातून विविध पर्यावरण विषयक दिन व सणांचे औचित्य साधून पर्यावरणविषयक जनजागृती करणे.

४. National Geographic Explorer या पुस्तकांच्या वाचनासाठी ६ स्तर (levels) आहेत. विद्यार्थी हरित सेना योजनेतंर्गत राष्ट्रीय हरित सेनेतील विद्यार्थ्यांना त्यांच्या स्तराशी सुसंगत अशी पुस्तके वाचनासाठी उपलब्ध करुन देता येतील. यामुळे पृथ्वीवरील जैवविविधतेचा आणि या सर्वातील परस्पर आंतरक्रियांचा अभ्यास करुन हरित सेनेतील विद्यार्थ्यांवर उत्तम संस्कार घडतील.

५. सदर योजना प्रायोगिक तत्वावर प्रथमत: तीन वर्षाकरिता सुरु राहील. तीन वर्षानंतर सदर योजनेच्या फलनिष्पत्तीबाबत आढावा घेऊन, योजना पुढे चालू ठेवावी किंवा कसे याबाबत शासनाकडून निर्णय घेण्यात येईल.

६. या योजनेसाठी नवीन लेखाशीर्ष घेण्यासाठी अनुमती देण्यात येत आहे. तसेच सदर योजनेसाठी दरवर्षी आवश्यक तो नियतव्यय उपलब्ध करुन घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

७. सदर योजना राबविण्यासाठीचा खर्च सन २०१६-१७ मधील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ३१९/१४७५, दिनांक २५.११.२०१६ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १८७/२०१६/व्यय-१० दिनांक ७.११.२०१६ व मा. मंत्रीमंडळाने दि. ५.०३.२०१७ रोजी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०६१६३२२८४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.06 16:35:14 +05'30'

(डी.एल.थोरात)
सह सचिव (वने)

**प्रति,**

१) अपर प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक,सामाजिक वनीकरण,महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) व्यवस्थापकीय संचालक,वन विकास महामंडळ, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), (सर्व)
७) वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण (सर्व).
८) उपवनसंरक्षक (प्रादेशिक) व उपसंचालक,सामाजिक वनीकरण (सर्व).
९) विभागीय वन अधिकारी, प्रादेशिक (सर्व).
१०) सर्व विभागीय आयुक्त.
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१२) सर्व जिल्हाधिकारी.
१३) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) कार्यासन अधिकारी, व्यय-१५/अर्थ - १७, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१९) कार्यासन अधिकारी/महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२१) निवड नस्ती/फ-११.